योग्यता प्रमाणपत्र नसलेल्या वाहनावर करावयाच्या कारवाईबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन परिपत्रक क्रमांक : एमव्हीआर-०९१८/प्र.क्र.२८१/परि-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक २१ .०९.२०१८.

वाचा:- क्र.पआका/का-४/जनहित याचिका २८-२०१३/जा.क्र.१९२५, दि.२९.११.२०१६.

**शासन परिपत्रक :-**

मा.उच्च न्यायालयाने जनहित याचिका क्र.२८/२०१३ मध्ये योग्यता प्रमाणपत्र नसलेल्या वाहनांवर परिवहन विभागामार्फत सद्यस्थितीमध्ये करण्यात येत असलेल्या कारवाईबाबत दि.०७.०९.२०१८ रोजीच्या आदेशामध्ये असमाधान व्यक्त केले आहे. उपरोक्त संदर्भीय परिवहन आयुक्त कार्यालयाच्या परिपत्रकान्वये योग्यता प्रमाणपत्र संपुष्टात आलेले, योग्यता प्रमाणपत्र आहे परंतु वाहन सार्वजनिक रस्त्यावर चालण्यास धोकादायक आहे अशा, प्रकारच्या वाहनांच्या तपासणीबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. तथापि, सदर सूचनांची प्रभावीरित्या अंमलबजावणी होत नसल्याचे निदर्शनास आलेले आहे. सदरची वस्तुस्थिती लक्षात घेवून खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. दि.०८.१०.२०१८ ते २३.१०.२०१८ या कालावधीमध्ये योग्यता प्रमाणपत्र नसलेली वाहने, योग्यता प्रमाणपत्र आहे परंतु सार्वजनिक रस्त्यावर चालण्यास धोकादायक वाहने यांची राज्यभर विशेष तपासणी मोहिम राबविण्यात यावी. सदर मोहिमेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी परिवहन आयुक्त कार्यालयातील परिवहन उपायुक्त व परिवहन सहआयुक्त यांना महसुली विभागनिहाय विभागांचे वाटप करुन त्यांचेवर कामकाजाची पर्यवेक्षकीय जबाबदारी परिवहन आयुक्त यांनी सोपवावी.

२. सदर मोहिममध्ये वाहनास वैध योग्यता प्रमाणपत्र आहे परंतु वाहन सदोष आहे, असे आढळल्यास तपासणी अधिकाऱ्याने सदर वाहनाचे योग्यता प्रमाणपत्र निलंबीत करावे व ते वाहन नजिकच्या दुरूस्ती केंद्रामध्ये अटकावून ठेवून दुरूस्ती केंद्र चालकाची वाहन त्याच्याकडे दुरूस्तीसाठी प्राप्त झाल्याबाबत स्वाक्षरीसह तपासणी प्रतिवेदनावर नोंद घ्यावी.

३. ज्या वाहनास योग्यता प्रमाणपत्र नाही, असे वाहन तपासणीत आढळल्यास तपासणी अधिकाऱ्याने ते वाहन नजिकच्या दुरूस्ती केंद्रामध्ये अटकावून ठेवून दुरूस्ती केंद्र चालकाची वाहन त्याच्याकडे दुरूस्तीसाठी प्राप्त झाल्याबाबत स्वाक्षरीसह तपासणी प्रतिवेदनावर नोंद घ्यावी.

४. वर नमूद दोन्ही प्रकरातील वाहने ही कारवाई पश्चात वाहन मालक दुरूस्ती केंद्रामधून वाहन रस्त्यावर चालण्यास योग्य (Road Worthy) करून घेऊन प्रतिवेदीत करणाऱ्या अधिकाऱ्याकडे सादर करेल याची खातरजमा प्रतिवेदन देणाऱ्या अधिकाऱ्याने करावयाची आहे. तद्नंतर महाराष्ट्र मोटार वाहन नियम, ४५ (८), (९) व (११) अन्वये कार्यवाही करावी.

५. तसेच त्या वाहनास योग्यता प्रमाणपत्र नुतनीकरणास अनुज्ञेय असणारे शुल्क स्वीकारून संबंधित प्रतिवेदन देणाऱ्या अधिकाऱ्याने वाहनाचे योग्यता प्रमाणपत्र पुर्नस्थापीत अथवा नुतनीकरण करण्याबाबत कार्यवाही करावी.

६. वाहनास वैध योग्यता प्रमाणपत्र नाही तथापि, सदर वाहन रस्त्यावर चालण्यास धोकादायक नाही अशा वाहनास कलम २०७ प्रमाणे अटकावून ठेवावे व कलम २०७ (२) नूसार विनंती आल्यास कलम २०६ अन्वये मुळ कागदपत्रे ताब्यात ठेवून सदर वाहन संबंधित कार्यालयाकडे योग्यता प्रमाणपत्र नुतनीकरण करण्यास जाण्यासाठी परवानगी द्यावी व सदर प्राधिकरणाने त्या वाहनाचे योग्यता प्रमाणपत्र प्रदान केल्यानंतरच सदर वाहनावरचा संबंधित खटला निरंक करावा.

७. क्षेत्रीय कार्यालयांच्या अधिनस्त असणाऱ्या वायुवेग पथकांनी परिवहन संवर्गातील वाहनांच्या तपासणीमध्ये योग्यता प्रमाणपत्र नसणे अथवा योग्यता प्रमाणपत्र असून देखील वाहन रस्त्यावर चालण्यास धोकादायक असणे याबाबत वर नमूद केल्याप्रमाणे या निर्देशांच्या दिनांकापासूनच कार्यवाही करण्यास आदेशीत करण्यात येत आहे.

८. तसेच कार्यालय प्रमुखांनी त्यांच्या अधिनस्त वायुवेग पथके वर नमूद केल्याप्रमाणे कार्यवाही करतात याची दैनंदिन खातरजमा करावी.

९. सदर प्रकरणी योग्यता प्रमाणपत्र संदर्भात वरील निर्देशांचे अनुपालन झाले नसल्याची बाब निदर्शनास आल्यास संबधित वायुवेग पथके ज्या कार्यालयाच्या अधिनस्त आहेत अश्या कार्यालयाचे कार्यालयप्रमुख शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील याची नोंद घ्यावी.

१०. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८०९२११११०५४६७४२९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Ashish Kumar Singh
Date: 2018.09.21 14:59:41 +05'30'

**(आशिष कुमार सिंह)**
प्रधान सचिव, (परिवहन व बंदरे)

**प्रति,**

१. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. परिवहन सहआयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. परिवहन उप आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी.
५. सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी.